**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत बंद असलेल्या प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना पुनरुज्जीवित करणेकरिता लेखाशिर्ष क्र. २२१५-९९५१ महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बेलापूर, नवी मुंबई यांच्यामार्फत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सातारा, लातूर व वाशिम या क्षेत्रिय कार्यालयास निधी वितरीत करणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०२२/प्र.क्र. ३८ /पापु-१९**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,

मंत्रालय, मुंबई-४०० ००१.

दिनांक: २३ मार्च, २०२३

<u>वाचा</u>

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दि. ०७ मे, २०१६
२) शासन निर्णय क्रमांक: मुपयो-२०२०/प्र.क्र.१६/पापु-१९, दि. ३१ ऑगस्ट, २०२०
३) शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०२२/प्र.क्र.२३ /पापु- १९,दि. २९. जून, २०२२
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.०६.०४.२०२१
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.२४.०६.२०२१
६) शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०२२/प्र.क्र.२३ /पापु- १९, दि. २९ जून, २०२२.
७) क्रमांक मजीप्रा/वित्त-२/निधी/मुख्यमंत्री पुन.यो/२२/२०२३, दि.१९ जानेवारी, २०२३
८) क्रमांक मजीप्रा/वित्त-२/निधी/मुख्यमंत्री पुन.यो/५२/२०२३, दि.१८ फेब्रुवारी, २०२३
९) क्रमांक मजीप्रा/वित्त-२/निधी/मुख्यमंत्री पुन.यो/८२/२०२३, दि.१७ मार्च, २०२३
१०) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३दि.०४.०४.२०२२.

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्रामीण जनतेस शुध्द व पुरेसे पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्यात मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम राबविण्यात येत आहे. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत बंद असलेल्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांच्या पुनरुज्जीवनाकरिता (लेखाशिर्ष क्रमांक २२१५- ९९५१ अंतर्गत) सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता रु.३८.०० कोटी इतक्या निधीची अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली असून, वित्त विभागाने अर्थसंकल्पिय तरतुदीच्या १०० टक्के निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर रु. २६.६० कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुनरुज्जीवीत करण्यास मंजुरी दिलेल्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांच्या अंमलबजावणीकरिता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई यांच्यामार्फत संचालक, (वित्त) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सातारा, लातूर व

वाशिम या क्षेत्रिय कार्यालयास रु.४७४.२४ ( अक्षरी रु. चार कोटी चौऱ्याहत्तर लाख चोवीस हजार फक्त) इतका निधी मंजूर व मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुनरुज्जीवीत करण्यास मंजूरी देण्यात आलेल्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांच्या अंमलबजावणीकरिता (लेखाशिर्ष क्र.२२१५ ९९५१ अंतर्गत) संचालक, (वित्त) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई यांच्यामार्फत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सातारा, लातूर व वाशिम या क्षेत्रिय कार्यालयास खालील विवरणपत्रात नमुद केल्याप्रमाणे निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (BDS) खालील अटींच्या अधीन राहून निधी मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**(रुपये लाखात )**

| अ. क. | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण क्षेत्रिय कार्यालय | योजनेचे नांव | वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर , नवी मुंबई | सातारा | मौजे. उंडाळे- १७ गावे( ता. कराड, जि. सातारा) प्रादेशिक पाणी पुरवठा योजना | १३५.३३ |
| २ | | लातूर | मौजे. किल्लारी व ३० गांवे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना , पुनरुज्जीवीत कार्यक्रम भाग - २ | ३०७.०० |
| ३ | | वाशिम | मौजे. म्हसणी १६ गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना | ३१.९१ |
| | | | एकूण १+२+३ | **४७४.२४** |

**अटीव शर्ती**

I. सदर निधी मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुनरुज्जीवीत करण्यास मंजूरी देण्यात आलेल्या प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजनांच्या अंमलबजावणी करिताच खर्च करण्यात यावा.

II. सदर निधी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे. तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरित करुन बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

III. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वितरीत करण्यात आलेला निधी स्वीय प्रपंजी (PLA) किंवा अशा अन्य खात्यामध्ये ठेवण्यात येऊ नये.

IV. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निधी मागणी करतांना चालू आर्थिक वर्षात वितरित करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादी बाबतची माहिती सादर केल्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार नाही.

V. ज्या प्रयोजनासाठी निधी वितरित करण्यात आलेला आहे, त्याबाबतची भौतिक प्रगतीची माहिती दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दर तीन महिन्यानी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहित प्रमाणपत्र या शासनाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी.

VI. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या व संदर्भाधीन क्र.८ येथील शासन परिपत्रकातील तसेच मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची जिल्हा परिषदेकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परिक्षणाकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

VII. अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना कार्यासन पापु-१९/पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई/नागपूर व पापु-१९ कार्यासनास सादर करावे.

VIII. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१० येथील शासन परिपत्रकातील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच उक्त परिपत्रकान्वये आवश्यक असलेली प्रमाणपत्रे शासनास सादर करण्यात यावीत.

२. या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना मुक्त करण्यात आलेला निधी रुपये **रु. ४७४.२४ लक्ष ( अक्षरी रु. चार कोटी चौऱ्याहत्तर लाख चोवीस हजार फक्त**) बाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त) (श्री. राजेंद्र मडके) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेला व अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, (श्री. चं.कृ मोरे ) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा

अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक( वित्त) (श्री. राजेंद्र मडके) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, ( श्री.चं. कृ. मोरे) यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहु रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३. याबाबतचा खर्च "मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२७) बंद पडलेल्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांचे पुनरुज्जीवन (२२१५ -९९५१)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र१० येथील परिपत्रकातील परिच्छेद-१ ते ४ मधील व त्यासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ९ मधील अ.क्र. १ ते १० मधील आवश्यक त्या बाबींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक: ११७/व्यय-३, दिनांक १६ मार्च, २०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२३१२४८३६६८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHANDRAKANT KRISHNA MORE

Digitally signed by CHANDRAKANT KRISHNA MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=11ac200219edb36f7777ee1101657bea4271090267228122b638d6f2cdedad62, pseudonym=268C7E15F99BF8B492638E14751A661EBCF0233F, serialNumber=2314CF333E070F9936792BC95890FA89B2F617A931B2B577B703FA858F3DF433, cn=CHANDRAKANT KRISHNA MORE
Date: 2023.03.23 15:39:38 +05'30'

**(चं. कृ.मोरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३) मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद

६) मा. विधानमंडळ सदस्य/संसद सदस्य (सर्व)

७) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव

८) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक

९) महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई

१०) महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर

११) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई

१२) संचालक (वित्त)महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई

१३) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, औरंगाबाद ,अमरावती व पुणे

१४) अभियान संचालक,(जजमि) राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई .

१५) उपसचिव ( अर्थ संकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१७) नियोजन विभाग (कार्यासन- १४४३)/ वित्त विभाग (कार्यासन व्यय-३)

१८) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासन क्र. पापु-०४ व पापु-२०

१९) कार्यकारी अभिंयता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, कराड, लातूर व वाशिम

२०) निवडनस्ती (पापु १९)